भारतीय प्रशासन सेवेतील नियुक्तीच्या प्रतिक्षेत असलेल्या अधिकाऱ्यांचे वेतन सामान्य प्रशासन विभागामार्फत अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एईओ-१०२०/प्र.क्र.१६४ /२०२०/दहा,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
तारीख: **१३.०७.२०२३**

**वाचा:** :- सामान्य प्रशासन विभाग यांचे आदेश क्र.एईओ-१०२०/प्र.क्र.१६४/२०२०/दहा, दि.०८.०६.२०२०.

**शासन निर्णय-**

भारतीय प्रशासन सेवेतील नियुक्तीच्या प्रतिक्षेत असलेल्या अधिकाऱ्यांचे वेतन सामान्य प्रशासन विभागामार्फत अदा करण्याकरिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाने दिनांक ०८.०६.२०२० रोजीच्या आदेशान्वये धोरण ठरविले आहे.

२. भारतीय प्रशासन सेवेतील खाली नमूद करण्यात आलेले अधिकारी हे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकापासून नियुक्तीच्या प्रतिक्षेत आहेत:-

| अ.क्र. | भाप्रसे अधिकाऱ्यांचे नाव | नियुक्तीच्या प्रतिक्षेत असल्याचा दिनांक |
|---|---|---|
| १ | श्री. वैभव वाघमारे, भाप्रसे (२०१९) | २७.०४.२०२३ पासून |
| २ | डॉ. प्रविण गेडाम, भाप्रसे (२००२) | ३१.०५.२०२३ पासून |
| ३ | डॉ. सोनिया सेठी, भाप्रसे (१९९४) | ०२.०६.२०२३ पासून |
| ४ | श्री. रुचेश जयवंशी, भाप्रसे (२००९) | ०८.०६.२०२३ पासून |

३. उपरोक्त तक्त्यात नमूद ०४ भाप्रसे अधिकाऱ्यांना ते नियुक्तीच्या प्रतिक्षेत असल्याच्या दिनांकापासून त्यांना प्रत्यक्ष पदस्थापना देईपर्यंतच्या कालावधीचे वेतन अदा करण्यासाठी, ते नियुक्तीच्या प्रतिक्षेत असल्याच्या दिनांकापासून त्यांना प्रत्यक्ष नियुक्ती देईपर्यंतच्या कालावधीकरीता चार अधिसंख्य पदे निर्माण करुन या अधिकाऱ्यांना सदर कालावधीचे वेतन सामान्य प्रशासन विभागांतर्गतच्या लेखाशिर्ष - मागणी क्रमांक ए-४, सचिवालय, सर्वसाधारण सेवा, ०९० सचिवालय (००) (०१), सामान्य प्रशासन विभाग (अनिवार्य), (०१), वेतन, (२०५२००२५) मधून अदा करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

४. वरीलप्रमाणे उपरोक्त अधिकाऱ्यांचे वेतन अदा करण्याबाबतची कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२६ (रोख शाखा) मार्फत करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारीक क्र.१५०९७, दिनांक ०९.०२.२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१३१०५२३७२५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUCHITA
MOHAN
MAHADIK

Digitally signed by SUCHITA MOHAN MAHADIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=6578e224c4a0d2c9bfb7e7e33b474757c1425d0a03e653bc4f0a25b70698158e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E146A6DDC8FB6681D49A5099661D41639DA6C568419F071BB9CDFD8A2E08058C, cn=SUCHITA MOHAN MAHADIK
Date: 2023.07.13 11:47:03 +05'30'

**(सु.मो.महाडिक)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) महालेखापाल, मुंबई / नागपूर,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
९) सामान्य प्रशासन विभाग, ९, ९-अ, कार्यासन-२६ (रोखशाखा),
१०) संबंधित अधिकारी,
११) निवडनस्ती.